**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**परिपत्रक क्रमांक -आस्था-२०११/प्र.क्र.३१/का.१५**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक : २७ मे, २०११.**

**परिपत्रकः-** आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय आश्रमशाळांतील शिक्षक संवर्गातील रिक्त पदे तातडीने भरण्याच्या अनुषंगाने दिनांक १० मे, २०११ रोजी प्रधान सचिव, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. शिक्षक संवर्गातील भरती प्रक्रियेमध्ये अधिकाधिक पारदर्शकता येण्यासाठी, नियुक्ती प्राधिकारी म्हणून सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना आता पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) शासन निर्णय क्र.आदिवासी विकास विभाग क्र.आस्था-१०९/प्र.क्र.१०१/का.१५, दिनांक १७ नोव्हेंबर, २००५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या अपर आयुक्त स्तरावरील प्रादेशिक समितीद्वारे भरती प्रक्रियेची कार्यवाही करण्यात यावी.

२) प्राथमिक शिक्षण सेवकांची पदे भरताना शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्रमांक PRT-२००६/(४७६७)/प्राशि-१, दिनांक १६/१२/२००९ च्या धर्तीवर खाली नमूद केल्याप्रमाणे २०० गुणांच्या परिक्षा पध्दतीचे आयोजन करावे व परिक्षेमध्ये प्राप्त झालेल्या गुणांच्या आधारावरच उमेदवारांची निवड करण्यात यावी व त्यासाठी कोणतीही मुलाखत घेण्यात येऊ नये--

| अ.क्र. | विषय | प्रश्न | गुण |
|---|---|---|---|
| १ | मराठी | २० | २० |
| २ | इंग्रजी | २० | २० |
| ३ | सामान्य ज्ञान (५ प्रश्न चालू घडामोडीवर) | २५ | २५ |
| ४ | विज्ञान | ५० | ५० |
| ५ | गणित | ५० | ५० |
| ६ | अध्यापन पदविका (D.Ed) अभ्यासक्रम | ३५ | ३५ |
| | एकूण | २०० | २०० |

३) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षक संवर्गातील भरतीसाठी सामान्य ज्ञान व बुध्दीमत्ता चाचणी या विषयावरील १०० गुणांची एक प्रश्नपत्रिका व ज्या विषयासाठी शिक्षकाची निवड करावयाची आहे त्यासाठी संबंधिताने घेतलेल्या B.Ed. अध्यापन पध्दतीवरील (Method) १०० गुणांची एक प्रश्नपत्रिका याप्रमाणे एकूण २०० गुणांच्या परिक्षेचे आयोजन करावे. ही परिक्षासुध्दा बहुपर्यायी वस्तुनिष्ठ स्वरुपाच्या प्रश्नांची ठेवावी व परिक्षेमध्ये प्राप्त झालेल्या गुणांच्या आधारावरच उमेदवारांची निवड करण्यात यावी, त्यासाठीसुद्धा कोणतीही मुलाखत घेण्यात येऊ नये.

•

४) भरती प्रक्रियेसाठी शासनमान्य बाह्य संस्थांची मदत घेता येईल परंतु परिक्षा शुल्कापोटी जमा आलेल्या ७५ टक्के रकमेमधूनच भरती प्रक्रियेवरील संपूर्ण खर्च भागविण्यात यावा व २५ टक्के रक्कम विभागाच्या महसूली जमाशीर्षात जमा करावी.

५) भरती प्रक्रियेसाठी घेण्यात येणारी परिक्षा ही बहुपर्यायी, वस्तुनिष्ठ प्रश्नांची राहील. परिक्षेतील प्रश्नांची उत्तरे नमूद करण्यासाठी (OMR) प्रकारच्या कार्बन कॉपीसह असलेल्या उत्तरपत्रिका वापराव्यात. प्रश्नांची उत्तरे बॉलपाईंट पेनद्वारे दर्शविण्याबाबत उमेदवारांना सूचना देण्यात याव्यात. परिक्षा संपल्यानंतर प्रश्नपत्रिका तसेच उत्तरपत्रिकेची कार्बन कॉपी उमेदवारांना सोबत घेऊन जाण्यास परवानगी देण्यात यावी. यानुषंगाने त्यांच्या परिक्षा प्रवेशपत्रावरच स्पष्टपणे सूचना देण्यात याव्यात.

६) संपूर्ण भरती प्रक्रिया पारदर्शकपणे पार पाडली जाईल याची सर्व संबंधित अपर आयुक्त यांनी दक्षता घ्यावी. त्यासाठी भरती परिक्षेनंतर निकालापूर्वी प्रश्नांची उत्तरतालीका आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या संकेतस्थळावर *(www.mahatribal.gov.in)* प्रसिध्द करावी. तसेच परिक्षेचा निकाल जाहीर करताना भरतीच्या प्रत्येक संवर्गासाठी प्रवर्गनिहाय गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Merit) जाहीर करावी.

७) भरती प्रक्रियेची सर्व कार्यवाही ३० जून, २०११ पर्यंत पूर्ण करावी.

८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

परिपत्रकातील वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी नियुक्ती प्राधिकारी म्हणून सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची राहील तर नियंत्रक अधिकारी म्हणून सदर जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास यांची राहील.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर *(www.maharashtra.gov.in)* उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०५२७१०१५०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(डॉ. रमेशचंद्र सागरे)
प्रधान सचिव

प्रति,
१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर
प्रत
१) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२) आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने
३) प्रधान सचिव/उप सचिव, आदिवासी विकास यांचे स्वियं सहाय्यक
४) निवडनस्ती का.१५.

D:\2011\Ho 50\CR 31-2011.lwp